**ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमासाठी मुख्य संसाधन संस्थांची निवड करणे बाबत**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः केआरसी -३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
दिनांक: १ सप्टेंबर, २०१४.

वाचा :-

१) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाचे पत्र क्र. डब्ल्यु-११०४२/३/२००२-सीआरएसपी दि. २०.६.२००३
२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे पत्र क्र. निर्मल-२००३/प्र.क्र.२४०/पापु-१६, दिनांक १०.११.२००३
३) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाचे पत्र क्र.डब्ल्यु-११०४२/३/२००३-सीआरएसपी, दिनांक ३.११.२००३
४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा शासन निर्णय क्र. निर्मल-१००४/प्र.क्र. ३७४/पापु-१६, दिनांक १६ एप्रिल, २००४
५) पाणी पुरवठाव स्वच्छता विभागाचा दिनांक २८ फेब्रुवारी, २००५ दिनांक ३० जुलै, २००५ व दिनांक २४ जानेवारी, २००६ रोजीचे शासन निर्णय क्र.निर्मल् -२००३/प्र.क्र.२४०/पापु-१६.
६) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा शासन निर्णय क्र. निर्मल-१००६/प्र.क्र.३/पापु-१६, दिनांक १ जून, २००६.
७) पाणी पुरवठा व स्व्च्छता विभागाचा शासन निर्णय क्र. निर्मल-१००६/प्र.क्र.१९१/पापु-१६ दिनांक २० नोव्हेंबर, २००६, दिनांक १२ डिसेंबर, २००६ व दिनांक १५ ऑक्टोंबर, २००७.
८) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे पत्र क्र. निर्मल-१००८/प्र.क्र.१७६/पापु-१६, दिनांक १८ ऑगष्ट, २००८.
९) पाणीपुरवठा विभागाचा शासन निर्णय क्र. निर्मल-१००९/प्र.क्र.१२७/पापु-१६, दिनांक ३० मे, २००९.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्रतील ग्रामीण पाणी व स्वच्छता कार्यक्रमास गती यावी या उद्देशाने केंद्र शासनाने यापूर्वी राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, निर्मल भारत अभियान आणि जागतिक बँक अर्थ सहाय्यीत राबविलेला जलस्वराज्य कार्यक्रम तसेच इतर ही पथदर्शी कार्यक्रमांची अंमलबजावणी राज्यामध्ये केली आहे. हे सर्व कार्यक्रम राज्य शासनामार्फत यशस्वीपणे राबविले जात आहेत. या कार्यक्रमांच्या अंमलबजावणी बाबत केंद्र व राज्य शासनास आलेला अनुभव, त्या आधारे केलेले मूल्यमापन आणि अभ्यास यांच्या आधारे ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता या कार्यक्रमांची अधिक प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी केंद्र व राज्य शासनाने वेळोवेळी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रामांच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी राज्य, जिल्हा व तालुका स्तरावर नियमित तसेच कंत्राटी स्वरूपाचे मनुष्यबळ उपलब्ध करून देण्यात आले आहे. ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमांच्या अंमलबजावणी संदर्भात गुणवत्ता, सहभागी घटकांची क्षमता, लोकसहभाग आणि कौशल्य विकासाची गरज याबाबी लक्षात घेता शासन यंत्रणेच्या जोडीला या अभियानाशी संबधित विषयांवर काम करणाऱ्या तज्ञ संस्थांचे सहकार्य घेतल्यास ग्रामीण पाणी व स्वच्छता कार्यक्रमांच्या गुणवत्तापुर्ण अंमलबजावणीची गती वाढेल असा शासनाला विश्वास वाटतो.

या पूर्वी संदर्भाधीन क्र. ५ व ९ च्या शासन निर्णयान्वये संपूर्ण स्वच्छता अभियानासाठी राज्यस्तरावर मुख्य साधन संस्थांची (KRC) निवड करण्यात आली होती. या संस्थांना निर्मल ग्राम पुरस्कारासाठी निवड केलेल्या ग्राम पंचायतची पूर्व तपासणी करण्याचे प्रमुख काम सोपविण्यात आले होते.

तथापि, क्षमता बांधणी, माहिती शिक्षण व संवाद, मूल्यमापन, संनियंत्रण, व पर्यवेक्षण, संशोधन,दस्ताऐवजीकरण, अंमलबजावणी, समुदाय संघटन, तंत्रज्ञान, तांत्रिक सहाय्य व साहित्य पुरवठा साखळी ह्या क्षेत्रनिहाय उपक्रमांमध्ये देखील मुख्य साधन संस्थांचा सहभाग वाढविणे तसेच मुख्य साधन संस्थांना राज्य, जिल्हा, तालुका आणि गावपातळीवरील शासन यंत्रणेस सहाय्यकारी स्वरूपात सहभागी करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होते .

**शासन निर्णय**

प्रस्तावेत नमूद केलेली वस्तुस्तिथी विचारात घेऊन मुख्य साधन संस्थाना बाबनिहाय उपक्रमामध्ये सहभागी करून घेण्यासाठी शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमासाठी राज्यस्तर, जिल्हास्तर, तालुकास्तर, व गावपातळीवरील पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमांच्या अंमलबजावणीमध्ये सहभाग घेण्यासाठी राज्यस्तर व जिल्हास्तरावर मुख्य साधन संस्थांची निवड करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे .

या शासन निर्णयाच्या अंमलबजावणीसाठी खालील मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करावा.

**१. मुख्य साधन संस्थांच्या निवडीचा उद्देश व आवश्यकता :-**

१) गाव, तालुका, जिल्हा व राज्य पातळीवरील सहभागी घटकांच्या ज्ञान, कौशल्य आणि दृष्टीकोनासंबंधी क्षमता विकास उपक्रम आयोजन करणे.

२) विविध स्तरावर सहभागी मनुष्यबळासाठी त्यांच्या जबाबदाऱ्या योग्य व निरंतर स्वरुपात पार पाडण्यासाठी आवश्यक व्यवसायिक आणि संवाद कौशल्य विकास उपक्रमाचे आयोजन करणे.

३) नवीन तंत्रज्ञान, प्रयोग, शोध आणि पध्दती संबंधी अभियानातील मानुष्यबळाला अद्यायावत ठेवण्यासाठी आवश्यक उपक्रमाचे आयोजन करणे.

४) लोकसहभागाच्या विविध उपयुक्त पध्दतीचा अवलंब करून निर्मल भारत अभियानातील लोकसहभाग अपेक्षित स्तरावर घेवून येणे.

५) अभियान अंमलबजावणीतील विविध टप्प्यावर गरजेनुसार पर्यवेक्षन, संनियत्रण, मूल्यमापन, परिणाम,अभ्यास,प्रक्रिया दस्ताऐवेजीकरण इ. सेवा नियमितपणे उपलब्ध होण्यासाठी उपक्रम राबविणे.

६) राज्यानुकुल तांत्रिक पर्यायावर संशोधन, प्रचलित तंत्रज्ञान परिणामकारकता अभ्यास इतर ठिकाणी सुरु असलेल्या तंत्रज्ञान विषयक संशोधनाव्दारे योग्य मार्गदर्शन.

७) निर्मल भारत अभियान प्रत्यक्ष अंमलबजावणीच्या माध्यमातून आदर्श प्रयोग आणि अंमलबजावणी पध्दतीचे उपयुक्त प्रारूप विकसित करणे.

८) स्वच्छता साधनांची उपलब्धता स्थानिक ठिकाणी सहज होऊ शकेल अशा व्यवस्था निर्माण होतील. यासाठी धोरणात्मक प्रयत्न करणे.

९) निर्मल दूत सारख्या उपक्रमांच्या माध्यमातून विविध उपक्रम अंमलबजावणी संबंधी पुढाकार घेवून अंमलबजावणीच्या यशस्वी पद्धतीचा विकास करणे.

२ . मुख्य साधन संस्थांनी प्रस्ताव सादर करताना अनुसरावयाची कार्यपध्दती :-

मुख्य साधन संस्थांनी परिशिष्ट - १ मध्ये जोडलेल्या विहित प्रपत्रात व आवश्यक कागदपत्रासह राज्यस्तरा करिता संचालक, पाणी व स्च्छता सहाय्य संस्था, बेलापुर, नवी मुबई यांचेकडे तर जिल्हा स्तरावरील मुख्य कार्यकारी अधिकारी सबंधित जिल्हा परिषद यांच्याकडे जाहिराती मधील विहित मुदतीत प्रस्ताव सादर करावेत.

३.मुख्य साधन संस्थाची निवड प्रक्रिया :-

मुख्य साधन संस्थांच्या निवडी करिता वर्तमान पत्रातून जाहिरात प्रसिध्द करून राज्य व जिल्हा स्तरासाठी स्वतंत्ररीत्या प्रस्ताव मागविण्यात येतील. मुख्य साधन संस्थांची निवड ही प्रस्ताव छाननी समिती क्षेत्रीय भेट समिती व राज्य निवड समिती यांचे मार्फत करण्यात येईल. प्राथमिक छाननी समिती मार्फत प्रस्तावांची पात्रते संदर्भात छाननी करण्यात येईल. छाननीअंती पात्र ठरलेल्या संस्थांना जिल्हास्तरीय क्षेत्रीय भेट समिती मार्फत भेटी देऊन विहित पद्धतीने तपासणी करण्यात येईल. तपासणी अंती क्षेत्रीय भेट समिती आपला अहवाल गुणांकनासह राज्य स्तरीय निवड समितीस सादर करेल.

मुख्य साधन संस्थांची निवड प्रक्रिये संबंधीचे सर्व अधिकार राज्यस्तरीय निवड समितीला राहतील. प्रस्ताव छाननी समिती, क्षेत्रीय भेट समिती व राज्यस्तरीय समितीचा तपशील परिशिष्ट - १ जोडला आहे.

निवडक राज्य स्तरीय मुख्य साधन संस्थांमधील काही संस्थांना त्याच्या कडील कौशल्ये व गुणवत्ता विचारात घेवून प्रधान साधन संस्था म्हणून निवड करण्याची कार्यवाही राज्य शासना मार्फत करण्यात येईल. अशा प्रधान साधन संस्थांकडे विशेष स्वरूपाची जबाबदारी सोपविण्यात येईल.

४. मुख्य साधन संस्थांनी शासनासोबत करावयाचा करारनामा :- निवड झालेल्या मुख्य साधन संस्थांनी राज्य स्तरीय मुख्य साधन संस्था आणि संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था तसेच जिल्हा स्तरीय मुख्य साधन संस्था आणि मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधीत जिल्हा परिषद यांच्यामध्ये विहित नमुन्यात करारनामा करणे बंधन कारक राहील.

**५. मुख्य साधन संस्थांची कर्तव्ये:-**

१) गाव ,तालुका , जिल्हा आणि राज्य स्तरावरील विविध सहभागी घटकाच्या गरजेनुसार प्रशिक्षण प्रारूप , प्रशिक्षण साहित्य विकसित करणे.

२) विविध स्तरावरील प्रशिक्षणासाठी तज्ञ प्रशिक्षकाची फळी विकसित करणे.

३) विविध स्तरावरील अभियानासाठी उपयुक्त प्रशिक्षणे , कार्यशाळा , मेळावे , परिषदाचे आयोजन करणे.

४) स्वच्छता सुविधा ( शौचालाय ,काम्पोस्त , सदपानी निचरा इ ) संबंधी संशोधन व प्रगत व्यवस्था विकसित करण्यासाठी प्रयोग्य करणे.

५) वापरातील प्रचलित स्वच्छता सुविधांच्या उपायुक्ततेचा अभ्यास करणे. शाश्वततेसाठी सुधारणा, उपयोजना सुचविणे.

६) अभियानाच्या अंमलबजावणीचे पर्यवेक्षण, संनियंत्रण, मूल्यमापन, परिणाम, अभ्यास, प्रक्रिया दस्ताऐवेजीकरण, निर्मल ग्राम तपासणी इ उपक्रमाचे नियोजन व अंमलबजावणी करणे.

७) अभियानातील निर्मल दूत उपक्रम राबविण्यात प्रत्यक्ष सहभाग घेवून गाव समूह , तालुका निर्मल करण्यात सहभागी होऊन कार्यक्रम राबविणे.

८) मागणीनुसार तालुकांतर्गत स्वच्छता साधनाचे विक्री केंद्र सुरु करणे.

९) माहिती शिक्षण व संवाद उपक्रमाची आणि विशेषत: अंतरव्यक्ती संवाद उपक्रमाची अंमलबजावणी करून लोकसहभाग निश्चीत करण्यात पुढाकार घेणे.

६. वार्षिक कृती आराखडा :-

ग्रामीण पाणीपुरवठा व स्वच्छता अभियान अधिक गतिमान करण्याच्या दृष्टीने राज्यस्तर निवड झालेल्या मुख्य साधन संस्थांच्या सहभागाने विविध उपक्रमांचा समावेश असणारा वार्षिक कृती आराखडा तयार करण्यात येईल. जिल्हा स्तरावरील वार्षिक कृती आराखडयास मान्यता देण्याचे अधिकार उपसचिव तथा प्रकल्प संचालक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई यांना राहतील.

वार्षिक कृती आराखड्यानुसार कामांची अंमलबजावणी करणे मुख्य साधन संस्थाना बंधनकारक राहील. मुख्य साधन संस्था आपल्या कार्यपूर्तीचा अहवाल दरमहा मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद व संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांना सादर करतील .

७. निधी वितरण :-

राज्यस्तरावरील साधन संस्थांना निधीचे वितरण संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचेकडून करण्यात येईल. जिल्हा सतरावरील साधन संस्थांना मुख्य कार्यकारी अधिकारी संबंधित जिल्हा परिषद यांचेकडून निधी वितरण करण्यात येईल.

मुख्य साधन संस्थांना निधी वितरण प्रथम हप्ता ३० % , दुसरा हप्ता ४०% आणि अंतिम हप्ता ३०% प्रमाणे तीन हप्त्यांमध्ये करण्यात येईल. प्रथम हप्ता वितरित करण्यापूर्वी संबंधित उपक्रमांच्या प्राथमिक तयारीचा स्वयंस्पष्ट अहवाल मुख्य साधन संस्थांनी संबंधित सक्षम प्राधिकरणास सादर करणे आवश्यक राहील . उर्वरित हप्त्यांची मागणी मुख्य साधन संस्थांनी लगतपूर्तेच्या टप्पातील कार्यपूर्तीचा संपूर्ण अहवाल, कार्यपूर्तीची छायाचित्रे तत्पूर्वीच्या टप्प्याच्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र सनदी लेखापालाकडून प्रमाणित करून घेवून संस्थेच्या प्रमुखांच्या स्वाक्षरीने सादर करणे बंधनकारक राहील. तसेच वर्ष अखेरीस संपूर्ण कार्यपूर्तीचा अहवाल लेखापरिक्षण अहवालासह संबंधीत सक्षम प्राधिकरणास सादर करणे आवश्यक राहील .

शासन निधीच्या वापरामध्ये आर्थिक अनियमतता झाल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आल्यास संबधित मुख्य साधन संस्थांना कायमस्वरूपी काळ्या यादीत टाकण्याची कार्यवाही शासन स्तरावरुन करण्यात येईल.

प्रत्येक आर्थिक वर्षाच्या अखेरीस मुख्य साधन संस्थांच्या कामगिरीचे शासनस्तरावरून मूल्यमापन करण्यात येईल . मुख्य साधन संस्थांनी आर्थिक वर्षाच्या समाप्तीनंतर पुढील १५ दिवसात ( दि. १५ एप्रिल पर्यत ) आपला स्वयंमूल्यनिर्धारण अहवाल संबधित सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करावा. संबधित प्राधिकरी हे मुख्य साधन संस्थांचा मूल्यांकन अहवाल सक्षम प्राधिकरण (पुढील १५ दिवसात दि ३० एप्रिल पर्यत ) राज्यस्तरीय निवड समितींस सदर करतील. राज्य स्तरीय निवड समिती मुख्य साधन संस्थांच्या कामाची प्रगती तपासून या संस्थांना मुदतवाढ देण्याचा निर्णय पुढील १० दिवसात (१० मे पर्यंत ) घेण्यात येईल. मुख्य साधन संस्थांची निवड जास्तीत जास्त ३ वर्षांसाठी राहील. तद्नंतर पुनश्च उपरोक्त परिशिष्ट-१ मध्ये नमुद पध्दत अवलंबून मुख्य साधन संस्थांची निवड यादी तयार करण्यात येईल.

या शासन निर्णयान्वये शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा दिनांक २८ फेब्रुवारी, २००५ दिनांक ३० जुलै, २००५ व दिनांक २४ जानेवारी, २००६ रोजीचे शासन निर्णय क्र.निर्मल - २००३/प्र.क्र.२४०/पापु-१६ आणि शासन निर्णय पाणीपुरवठा विभागाचा शासन निर्णय क्र. निर्मल-१००९/प्र.क्र.१२७/पापु-१६, दिनांक ३० मे, २००९ अधिक्रमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१४०९०११७३४३९२२२८असा आहे.

सदर आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशाने व नावाने .

Rajesh Kumar

Digitally signed by Rajesh Kumar
DN: CN = Rajesh Kumar, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2014.09.02 16:01:58 +05'30'

(राजेश कुमार )
प्रधान सचिव

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
३. मा.प्रधान सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
४. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर,नवी मुंबई
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
७. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
८. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
९. महासंचालक, आरोग्य महासंचालनालय, मुंबई
१०. संचालक,नगरपालिका प्रशासन, वरळी, मुंबई

११. सदस्य सचिव (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१४. मुख्याधिकारी, नगरपरिषद (सर्व)
१५. सर्व पर्यवेक्षीय अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१६. सर्व कार्यासने, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१७.ग्रामोपयोगी विज्ञान केंद्र, पो.बॉक्स नं. २९, दत्तपूर, वर्धा
१८. निर्मल गाव निर्माण केंद्र, मु. गोवर्धन,गंगापूर रोड, नासिक
१९. अप्पा पटवर्धन सफाई व पर्यावरण तंत्रनिकेतन, देहूरोड, ता. हवेली जिल्हा, पुणे
२०. महाराष्ट्र गांधी स्मारक निधी, सर्वे क्र. ३६, गांधी भवन कोथरुड, पुणे
२१. महात्मा फुले समाज सेवा मंडळ, नियोजन नगर, जामखेड रोड, पोष्ट बॉक्स नं. ९
२२. करमाळा, जिल्हा सोलापूर
२३.जानकी देवी बजाज ग्राम विकास संस्था, सर्व्हे नं. ४२७२, आकुर्डी पोस्ट ऑफिसजवळ आकुर्डी, पुणे
२४. कुष्ठरोग निवारण समिती, पो. नेरे, ता. पानवेल, जिल्हा रायगड
२५. सोसायटी फॉर इम्पॉवर ऑफ व्हिलेजेस ॲण्ड ॲग्रीकल्चर (सेवा), सातारा
२६. प्राइमुव्ह इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलेपमेंट, सी-३, ३०४ बी सौदामिनी कॉम्प्लेक्स, उजवी भूसारी कॉलनी, पौड रोड, पुणे
२७.गोपूरी आश्रम, मु.पो.वागदे, गोपूरी, ता. कणकवली, जिल्हा सिंधुदुर्ग
२८. ॲक्शन फॉर ॲग्रिकल्चरल रिन्युअल इन महाराष्ट्र, रसायनी पार्क, मार्केट यार्ड, पुणे
२९. ईकोसॅन सर्व्हिसेस फाउंडेशन, फलॅट क्र. १, पहिला मजला, २४, प्रशांत नगर, ७२१/१, पेठ, पुणे
३०. स्वंयशिक्षण प्रयोग, उस्मानाबाद, जिल्हा उस्मानाबाद
३१. संस्कार वाहिनी ग्राम विकास संस्था, ४४ कोल्हटकर कॉलनी, शिलांगन रोड, अमरावती
३२. अथिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था, पि नाक मेमरिज, फेज २, एल बिल्डिंग, कोथरुड स्टँड जवळ, पुणे
३३. टाटा सामाजिक विज्ञान संस्था, तुळजापूर परिसर, आपलिंग रोड, तुळजापूर, जिल्हा उस्मानाबाद
३४. डॉ. आंबेडकर शिक्षण, शेती संसाधन आणि विकास संस्था, मु. पो. चोरोची ता. कवठेमहाकांळ, जिल्हा सांगली
३५. रिद्धी फॉंउडेशन, कलकत्ता
३६. उगम ग्रामीण विकास संस्था, उमरा सोडेगाव फाटा ता.

३७. आयडियल सेंटर फॉर एन्टपप्रिनिअरशिप डेव्हलपमेंट ॲण्ड सेल्फएम्प्लॉयमेंट ट्रेंनिंग,सांगली
३८. सोसा ट्रेनिंग ॲण्ड प्रमोशन ट्रेनिंग इनस्टिटयुट (स्टापी), म्हाडा कर्मशियल कॉम्प्लेक्स, पहिला मजला महाराष्ट्र हाउसिंग बोर्ड कॉलनी, सैनिक सहकारी, पुणे
३९. प्रगती बहुउद्देशीय संस्था, क.भा. लांडगे, तहसिल कचेरीजवळ, सलीम नगर वरोरा,चंद्रपूर

(शासन निर्णय क्र.केआरसी - ३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८, दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट - १

## राज्य स्तर व जिल्हा स्तरावर मुख्य साधन संस्था म्हणून प्रस्ताव सादर करण्यासाठी मार्गदर्शक सूचना

पाणी व स्वच्छता क्षेत्रातील मुख्य साधन सहाय्यकारी संस्थांच्या (KRC) प्रस्ताव राज्यस्तर व जिल्हास्तरासाठी स्वतंत्ररित्या मागविण्यात येतील. मुख्य साधन सहाय्यकारी संस्थांच्या (KRC) प्रस्ताव मागविण्याचा विहित नमुना उपलब्ध करुन देण्यात येईल. दोन्हीस्तरावरील प्रस्तावाची छाननी करण्यासाठी एकच समिती काम करेल. संस्थेचे प्रस्ताव तपासताना संस्थांचे अनुभव, मनुष्यबळ, आर्थिक क्षमता व भौतिक सुविधा या बाबींचा विचार करुन तपासणी करण्यात येईल.

| अ. क्र. | तपशिल | अपेक्षित विवरण | जोडपत्रे |
|---|---|---|---|
| १ | संस्थेचे नांव | | |
| २ | संस्थेचा संपर्क पत्ता | | |
| ३ | स्थापना दिनांक | | |
| ४ | नोंदणी प्रकार आणि दिनांक | | नोंदणी प्रमाणपत्र |
| ५ | संस्था पदाधिकारी | | पदाधिकाऱ्यांची यादी |
| ६ | संपर्क व्यक्ति | | |
| ७ | संस्थेचे उद्देश | ठळक पाच उदीष्टये | संस्थेच्या घटनेची प्रत |
| ८ | संस्थेचे भौगोलिक कार्यक्षेत्र | गावांची संख्या व तालुका, जिल्हयांची नांवे | वार्षिक अहवाल |
| ९ | संस्थेचे कार्यक्रमात्मक कार्यक्षेत्र | संस्था काम करत असलेल्या पाच महत्वाच्या विषयांची (उदा. पाणी व स्वच्छता इ.) नावे | |
| १० | संस्थेकडे उपलब्ध मनुष्यबळ | नाव, शिक्षण, वय, पुर्वानुभव, विशेष प्राविण्य आणि विशेष उपलब्धी | यादी जोडावी. |
| ११ | संस्थेकडील उपलब्ध भौतिक साधन सुविधा | कार्यालय, प्रशिक्षण कक्ष, निवास व्यवस्था, प्रशिक्षण साहित्य, वाहन, कार्यालयीन सुविधा याचा संख्या व आकारमानासह गरजेनुसार तपशिल. | यादी जोडावी. |
| १२ | संस्थेने गेल्या तीन वर्षात ज्या | संस्थेला मिळालेले कार्यादेश, निवडीची | पत्रांच्या प्रती |

| | | | |
|---|---|---|---|
| | दाता / शासकिय संस्थासोबत काम केले त्याचा तपशिल | पत्रे | |
| १३ | संस्थेने गेल्या तीन वर्षात राबविलेल्या प्रकल्पांची माहिती | प्रकल्पांची यादी, संस्थेला मिळालेले कार्यादेश, निवडीची पत्रे | पत्रांच्या प्रती |
| १४ | संस्थेने गेल्या तीन वर्षात आयोजित केलेल्या क्षमता बांधणी प्रशिक्षणांचा तपशिल | प्रशिक्षणांची यादी, संस्थेला मिळालेले कार्यादेश, निवडीची पत्रे | पत्रांच्या प्रती |
| १५ | संस्थेने गेल्या तीन वर्षात लोकसहभाग व अंतर व्यक्ति संवाद संबंधी राबविलेल्या उपक्रमांचा तपशिल | उपक्रमांची यादी, संस्थेला मिळालेले कार्यादेश, निवडीची पत्रे | पत्रांच्या प्रती |
| १६ | संस्थेने गेल्या तीन वर्षात विविध पातळयांवर स्वच्छता संबंधी केलेल्या कामांचा तपशिल | उपक्रमांची यादी, संस्थेला मिळालेले कार्यादेश, निवडीची पत्रे | पत्रांच्या प्रती |
| १७ | संस्थेची गेल्या तीन वर्षाची आर्थिक उलाढाल | गेल्या तीन वर्षातील वर्षवार आर्थिक उलाढाल | अंकेक्षित अहवालाच्या प्रती |
| १८ | संस्थेने गेल्या तीन वर्षात तयार केलेले प्रशिक्षण प्रारुपे, संवाद साहित्य | प्रशिक्षण प्रारुप व संवाद साहित्याचा तपशिल | यादी |
| १९ | संस्थेला मिळालेले पुरस्कार | पुरस्कारांची नांवे | पुरस्कार, प्रामणपत्र प्रती |
| २० | संस्थेसंबंधी विशेष बाबी | स्थापना, उपक्रम, उद्दिष्ट या संबंधी काही विशेष बाबी असल्यास त्यांचा तपशिल | |
| २१ | स्वच्छता क्षेत्रात आगामी काळात संस्थेने काही उपक्रमांचे नियोजन केलेले असल्यास त्याचा तपशिल | | |
| २२ | संस्था स्वच्छता क्षेत्रात मुख्य साधन संस्था म्हणून काम करण्यास सक्षम असल्यास संबंधीचे निवेदन | संस्थेची सक्षमता सिध्द करु शकेल असे एका पानाचे टिपण जोडावे. | |

(शासन निर्णय क्र.केआरसी-३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक१सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट - २

## मुख्य साधन संस्थांचा क्षमता बांधणी उपक्रमामध्ये सहभाग घेण्यासाठी मार्गदर्शक सूचना

**राज्य स्तर व जिल्हास्तरावरील पाणी व स्वच्छता क्षेत्रातील विविध स्तरावरील सहभागीघटकांच्या क्षमता बांधणी उपक्रमात मुख्य साधन संस्थांनी विविध उपक्रम सहभाग व अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना**

**मुख्य साधन संस्थांचा सहभाग पुढील प्रमाणे असेल**
**अ.क्षमता बांधणी प्रशिक्षणे**

**पाणी व स्वच्छता क्षेत्राशी संबंधित विविध सहभागी घटकांसाठी नियोजन,समन्वय, संकल्पना प्रशिक्षण, अंमलबजावणी प्रशिक्षण, देखरेख व मुल्यमापन, दस्ताऐवजी करण, भुमिका आणि जबाबदारी प्रशिक्षण, देखभाल दुरुस्ती, लेखाविषयक, संवाद कौशल्य, प्रकल्प व्यवस्थापन, व्यकित्मत्व विकास, कौशल्य वृध्दी, तंत्रज्ञान इ.प्रकारच्या क्षमता बांधणी प्रशिक्षणांचे आयोजन मुख्य साधन संस्थांकडून केले जाईल. राज्य व विभागस्तरावरील क्षमता बांधणी उपक्रम प्रधान साधन संस्थाआणि राज्य साधन संस्था करतील तर जिल्हास्तरावर आयोजनाचे काम जिल्हा साधन संस्थांकडून केले जाईल.**

**ब. प्रशिक्षण प्रारुप विकसीत करणे**

पाणी व स्वच्छता क्षेत्राशी संबंधित विविध सहभागी घटकांसाठी नियोजन, समन्वय,संकल्पना प्रशिक्षण, अंमलबजावणी प्रशिक्षण, देखरेख व मुल्यमापन, दस्ताऐवजी करण, भुमिका आणि जबाबदारी प्रशिक्षण, देखभाल दुरुस्ती, लेखाविषयक, संवाद कौशल्य, प्रकल्प व्यवस्थापन, व्यकित्मत्व विकास,कौशल्य वृध्दी, तंत्रज्ञान इ. प्रशिक्षण प्रारुप विकसीत करणे ही कामे प्रधान व राज्यस्तरीय साधन संस्थांकडून करण्यात येतील.

**क. प्रशिक्षण साहित्य विकसीत करणे**

पाणी व स्वच्छता क्षेत्राशी संबंधित विविध सहभागी घटकांसाठी नियोजन, समन्वय,संकल्पना प्रशिक्षण, अंमलबजावणी प्रशिक्षण, देखरेख व मुल्यमापन, दस्ताऐवजी करण, भुमिका आणि जबाबदारी प्रशिक्षण, देखभाल दुरुस्ती, लेखाविषयक, संवाद कौशल्य, प्रकल्प व्यवस्थापन, व्यकित्मत्व विकास, कौशल्य वृध्दी, तंत्रज्ञान इ. प्रशिक्षणा संबंधीचे प्रशिक्षण साहित्य प्रधान व राज्यस्तरीय साधन संस्थांकडून करण्यात येतील.

ङ .परिषदा

पाणी व स्वआच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविधस्तरावर परिषदांचे आयोजन करण्याचे काम राज्य व विभागस्तरावर प्रधान व राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थां करतील. जिल्हास्तरावरील परिषदांचे आयोजन जिल्हा मुख्य साधन संस्थांकडून करण्यात येईल.

इ. कार्यशाळा

पाणी व स्वाच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविधस्तरावर कार्यशाळांचे आयोजन करण्याचे काम राज्य व विभागस्तरावर प्रधान व राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थां करतील. जिल्हास्तरावरील कार्यशाळांचे आयोजन जिल्हा मुख्य साधन संस्थांकडून करण्यात येईल.

ई. अभ्यास दौरे

पाणी व स्वाच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविधस्तरावर अभ्यास दौऱ्यांचे आयोजन करण्याचे काम राज्य व विभागस्तरावर प्रधान व राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थां करतील. जिल्हास्तरावरील अभ्यास दौऱ्यांचे आयोजन जिल्हा मुख्य साधन संस्थांकडून करण्यात येईल.

फ. प्रात्यक्षिक

पाणी व स्विच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविधस्तरावर प्रात्यक्षिकांचे आयोजन करण्याचे काम राज्य व विभागस्तरावर प्रधान व राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थां करतील. जिल्हास्तरावरील प्रात्यक्षिकांचे आयोजन जिल्हा मुख्य साधन संस्थांकडून करण्यात येईल.

## निधी क्षमता बांधणी प्रशिक्षण निधीच्या खर्चाची तरतुद

राज्य, विभाग, जिल्हा, तालुका आणि गावस्तरावरील निवासी व अनिवासी क्षमता बांधणी प्रशिक्षणासाठीचा खर्च निर्मल भारत अभियान , राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, जलस्वराज्य टप्पा - २ कार्यक्रम तसेच इतर तत्सम कार्यक्रमातर्गत माहिती शिक्षण संवाद व मनुष्यबळ विकास उपलेखा शिर्षा अंतर्गत उपलब्ध निधीमधून भागविण्यात येईल. या प्रशिक्षणांसाठी निधीची तरतुद पुढील प्रमाणे असेल.

| क्षमता बांधणी तपशिल | गावपातळी | | तालुका पातळी | | जिल्हा पातळी | | विभाग पातळी | | राज्य पातळी * | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | निवासी | अनिवासी | निवासी | अनिवासी | निवासी | अनिवासी | निवासी | अनिवासी | वासी | निवासी |
| प्रशिक्षणे | ५०० | ३५० | ६०० | ४०० | १००० | ७०० | १२०० | ९०० | २००० | १२०० |
| कार्यशाळा | ---- | ---- | ---- | ७०० | १००० | ७०० | १२०० | ९०० | २००० | १५०० |
| अभ्यास दौरे | | | | | | १००० | २००० | १५०० | | |
| प्रात्यक्षिके | प्रात्यक्षिकाचे स्वरुप व व्यापकता लक्षात घेऊन दराची पुर्वनिश्चिती राज्यस्तरावरुन करण्यात येईल. | | | | | | | | | |

तांत्रिक प्रशिक्षणासाठी गरजेनुसार लागणाऱ्या प्रशिक्षण व प्रात्यक्षिक साहित्यासाठी लागणारा खर्च आणि विशेष तज्ञांचे मानधन नियमित निधीच्या व्यतिरिक्त वेगळे दिले जाईल.

प्रशिक्षण प्रारुप निर्मितीचे काम केवळ राज्यस्तरावरिल साधन संस्थेकडुन करुन घेतले जाईल. दर निश्चितीसाठी अंतर्गत दर पत्रके / निविदा प्रक्रिया राबविण्यात येईल.

**(शासन निर्णय क्र.केआरसी-३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)**

# परिशिष्ट - ३

## राज्य स्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांनी माहिती शिक्षण व संवादाच्या विविध उपक्रम राबविण्यासाठी मार्गदर्शक सूचना

**अ. गावसभा / समुदायसभा**

पाणी व स्वाच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार राज्य व जिल्हास्तरावरुन मिळालेल्या सूचनेनूसार गावसभा/ समुदायसभा व अनुषंगिक बैठकांचे आयोजन करण्यात येईल यामध्ये विविध सहभागी घटकांचा समावेश अपेक्षित आहे.

**ब. अंर्तव्यक्ती संवादासाठी गृहभेटी**

पाणी व स्वकच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार राज्य व जिल्हास्तरावरुन मिळालेल्या सूचनेनूसार विविध स्वरुपाच्या कार्यक्रम/उपक्रमांना गावपातळीवर व्यापक प्रमाणात राबविण्यासाठी प्रत्यक्ष गृह भेटी करुन कार्यक्रम / उपक्रमांचा हेतू साध्य करण्यात येईल.

**क.मेळावे**

पाणी व स्वाच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार राज्य व जिल्हास्तरावरुन मिळालेल्या सूचनेनूसार विविध स्वरुपाच्या कार्यक्रम/उपक्रमांना व्यापक प्रमाणात राबविण्यासाठी विविधस्तरावर विविध सहभागी घटकांसाठी मेळावांचे आयोजन करण्यात येईल.

**ङ. रॅली**

पाणी व स्वयच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार राज्य व जिल्हास्तरावरुन मिळालेल्या सूचनेनूसार विविध स्वरुपाच्या कार्यक्रम/उपक्रमांची लोक जागृती व्यापक प्रमाणात होण्यासाठी विविधस्तरावर आयोजन करण्यात येईल.

**इ.प्रदर्शने**

पाणी व स्वच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार राज्य व जिल्हास्तरावरुन मिळालेल्या सूचनेनूसार विविध स्वरुपाच्या विषयान्वये प्रदर्शनाचे आयोजन करणे.

**ई.कलापथक**

पाणी व स्वपच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार राज्य व जिल्हास्तरावरुन मिळालेल्या सूचनेनूसार विविध स्वरुपाच्या कार्यक्रम / उपक्रमांची लोक जागृती लोक कलेच्या माध्यमातून व्यापक प्रमाणात सर्व घटकांपर्यंत पोहचविण्यासाठी विविधस्तरावर आयोजन करण्यात येईल.

**फ.विविध स्पर्धा**

पाणी व स्वरच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार राज्य व जिल्हास्तरावरुन मिळालेल्या सूचनेनूसार विविध उपक्रमांच्या गरजेनुसार स्पर्धात्मक कार्यक्रम आयोजित करण्यात येईल.

**प.धार्मिक उपक्रम / उत्सव ***

पाणी व स्वरच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार राज्य व जिल्हास्तरावरुन मिळालेल्या सूचनेनूसार विविध उपक्रमांच्या गरजेनुसार स्थानिक उत्सवानुसार कार्यक्रमाचे आयोजित करण्यात येईल.

**ग.विशेष अभियान**

पाणी व स्वरच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार राज्य व जिल्हास्तरावरुन मिळालेल्या सूचनेनूसार विविध उपक्रमांच्या गरजेनुसार विविध घटकासाठी विशेष अभियान राबविण्यात येईल.

**घ.निर्मल दूत (IPC)**

जिल्हास्तरीय मुख्य साधन संस्थाकडून प्रकल्प क्षेत्रांतील गावांमधून अंर्तव्यक्ति संवाद उपक्रमांची निर्मल दूतच्या माध्यमांतून अंमलबजावणी करण्यात येईल.

## निधी क्षमता बांधणी प्रशिक्षण निधीच्या खर्चाची तरतुद

राज्य, विभाग, जिल्हा, तालुका आणि गावस्तरावरील निवासी व अनिवासी क्षमता बांधणी प्रशिक्षणासाठीचा खर्च निर्मल भारत अभियान , राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, जलस्वराज्य टप्पा -२ कार्यक्रम तसेच इतर तत्सम कार्यक्रमातर्गत माहिती शिक्षण संवाद व मनुष्यबळ विकास उपलेखा शिर्षा अंतर्गत उपलब्ध निधीमधून भागविण्यात येईल. या प्रशिक्षणांसाठी निधीची तरतुद पुढील प्रमाणे असेल.

| कामाचे स्वरुप | सर्व साधारण विषय | गावपातळी | |
|---|---|---|---|
| | | निवासी | अनिवासी |
| गाव व ग्रामसभा | पाणी व स्वच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविध सहभागी घटकांसाठी | | २००० |
| अंर्तव्यक्ती संवादासाठी गृहभेटी | अभियानात सहभागी ग्रामीण कुटूंबासह | | |
| मेळावे | पाणी व स्वच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविध सहभागी घटकांसाठी | | १०००० |
| रॅली | पाणी व स्वच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविध सहभागी घटकांसाठी | | २००० |
| प्रदर्शने | पाणी व स्वच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविध सहभागी घटकांसाठी | | ५००० |
| कलापथक | पाणी व स्वच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविध सहभागी घटकांसाठी | | ५००० |

| | | | |
|---|---|---|---|
| विविध स्पर्धा | पाणी व स्वच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविध सहभागी घटकांसाठी | | २००० |
| उत्सव * | पाणी व स्वच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविध सहभागी घटकांसाठी | | २०००* |
| विशेष अभियान | पाणी व स्वच्छतेच्या अनुषंगाने गरजेनुसार विविध सहभागी घटकांसाठी | | |
| निर्मल दूत (IPC) | प्रकल्प क्षेत्रांतील गावांमधून अंर्तव्यक्ति संवाद उपक्रमांची निर्मल दूत माध्यमांतून अंमलबजावणी. | | |
| धार्मिक उपक्रम | धार्मिक नेते व सार्वजनिक धार्मिक उत्सवासोबतचे उपक्रम | | |

(शासन निर्णय क्र.केआरसी-३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट - ४

## राज्य स्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांनी करावयाच्या मूल्यमापन, सनियंत्रण व पर्यवेक्षणासाठी मार्गदर्शक सूचना

**अ.मूल्यमापन, सनियंत्रण व पर्यवेक्षण**

कार्यक्रम अंमलबजावणी निरंतर मुल्यमापन, संनियंत्रण व पर्यवेक्षणाचे काम प्रधान व राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थांकडून करण्यात येईल. तसेच प्रशिक्षण मूल्यमापन, विशेष उपक्रम मूल्यमापन गरजेनुसार करुन घेतले जाईल.

**आ.निर्मल ग्राम तपासणी**

केंद्र व राज्य शासनाच्या मार्गदर्शन सूचनेनुसार निर्मल पुरस्कारासाठी प्रस्तावीत ग्रामपंचायतीची जिल्हाअंतर्गत तपासणी जिल्हा मुख्य साधन संस्था करतील. राज्यस्तरीय तपासणीचे काम प्रधान व राज्य मुख्य साधन संस्था करतील यासाठी पध्दती व दर वेळोवेळी निश्चित करण्यात येतील.

**(शासन निर्णय क्र.केआरसी§३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)**

# परिशिष्ट - ५

## राज्य स्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांना संशोधनात्मक काम करण्यासाठी मार्गदर्शक सूचना

**संशोधन**

पाणी व स्वच्छता क्षेत्रात प्रक्रिया, परिणाम, तंत्रज्ञान विकास इत्यादी संबंधी प्रधान व राज्य मुख्य साधन संस्थाकडून संशोधनात्मक काम करुन घेण्यात येईल. यासाठी गरजेनुसार प्रस्ताव मागविण्यात येतील आणि अंतर्गत निविदा पध्दतीने दर निश्चित करण्यात येईल.

(शासन निर्णय क्र.केआरसी§३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट - ६

## राज्य स्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांनी दस्तऐवजीकरण करण्यासाठी मार्गदर्शक सूचना

**दस्तऐवजीकरण**

पाणी व स्वच्छता क्षेत्रात विविध उपक्रमांतर्गत केलेल्या अंमलबजावणी संबंधात यशोगाथा, नमूना अभ्यास, प्रक्रिया अहवाल, प्रशिक्षण, कार्यशाळा आणि परिषद अहवाल इत्यादी संबंधी प्रधान व राज्य मुख्य साधन संस्थाकडून दस्तऐवजीकरणाचे काम करुन घेण्यात येईल. यासाठी गरजेनुसार प्रस्ताव मागविण्यात येतील आणि अंतर्गत निविदा/दरपत्रक पध्दतीने दर निश्चित करण्यात येईल.

**(शासन निर्णय क्र.केआरसी§३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)**

# परिशिष्ट - ७

## राज्य स्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांनी पाणी व स्वच्छता संबंधी प्रकल्पांची व प्रकल्प घटकांची थेट अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना

**अंमलबजावणी**

पाणी व स्वच्छता संबंधी प्रकल्पांची व प्रकल्प घटकांची थेट अंमलबजावणी उदा. हागणदारी निर्मूलन कृती आराखडा, निर्मलदूत, स्थानिक संस्थीकरण इ. कामात जिलहास्तरीय मुख्य साधन संस्थांना सहभागी करुन घेण्यात येईल. विशेषत: मुख्य साधन संस्थांना गावे हागणदारीमुक्त करण्यासंदर्भात प्रकल्प देण्यात येतील. हे प्रकल्प निर्मल दूत उपक्रमाला जोडून असतील. यासाठी राज्यस्तरावरुन निर्मलदूत संदर्भात परिशिष्ठ - ११ प्रमाणे कार्यवाही करावी. त्या शिवाय सविस्तर मार्गदर्शक सूचना पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेकडून आवश्यकते प्रमाणे वेळोवेळी मार्गदर्शक सूचना निगर्मित करण्यात येतील.

खालील प्रमाणे विशिष्ट प्रकल्प किंवा उपक्रमाच्या अंमलबजावणीमध्ये मुख्य साधन संस्थांनी थेट सहभाग घ्यावा.

१.हागणदारी  निर्मूलन कृती आराखडा

२.निर्मलदूत

३.स्थानिक संस्थीकरण

४.स्वच्छ भारत अभियान

५.विविध दिन व सप्ताह

६.ग्रामीण संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान

७.नागरी संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान

या शिवाय राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, निर्मलभारत अभियान आणि जलस्वराज्य कार्यक्रम यासारख्या महत्वांकांक्षी कार्यक्रमांच्या अंमलबजावणीमध्ये मुख्य साधन संस्थांचा थेट सहभाग घेण्यासाठी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेकडून आवश्यकते प्रमाणे वेळोवेळी मार्गदर्शक सूचना निगर्मित करण्यात याव्यात.

(शासन निर्णय क्र.केआरसी§३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट - ८

## राज्य स्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांनी पाणी व स्वच्छता क्षेत्रातील समुदाय संघटनाचे विविध उपक्रम राबविण्यासाठी मार्गदर्शक सूचना

**समुदाय संघटन**

**अ.नेटवर्किंग**

सामाजिक संघटनांमधील समन्वयातुन पाणी व स्वच्छता क्षेत्रातील उपक्रमांना जनाधार मिळवुन देण्यासाठी नेटवर्किंग विकसित करणे.

**अ.मेळावे**

महिला, युवक, युवती, भजनी मंडळ, महिला मंडळ इ. समाजाधारित संस्थांच्या सहभागासाठी मेळावे घेण्यासाठी त्या त्या वेळेस लागणाऱ्या खर्चासाठी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने या बाबत मार्गदर्शक सूचना निर्मित करावी.

(शासन निर्णय क्र.केआरसी§३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट - ९

## राज्य स्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांनी पाणी व स्वच्छता क्षेत्रातील तंत्रज्ञानाचे विविध उपक्रम राबविण्यासाठी मार्गदर्शक सूचना

**तंत्रज्ञान**

**प्रयोग, प्रात्यक्षिक अभ्यास आणि नवनिर्मिती**

पाणी व स्वच्छता क्षेत्रासंबंधी ग्रामीण भागासाठी उपयुक्त प्रयोग, पारंपारिक व आधुनिक पाणी व स्वच्छता संबंधी व्यवस्थांचा अभ्यास आणि उपयुक्त व उपयोजित तंत्रज्ञान विकसित करणे. यासारख्या बाबी मुख्य साधन संस्थांनी हाताळल्यास किंवा उपयुक्त तंत्रज्ञान विकसित केल्यास या बाबतचा मोबदला देण्यासाठीचे निकष, नियम, अटी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेकडून वेगळयाने निर्गमित करण्यात यावेत.

(शासन निर्णय क्र.केआरसी§३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट - १०

## राज्य स्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांनी स्वच्छता साधने उत्पादन व विक्री केंद्र या सारखे उपक्रम राबविण्यासाठी मार्गदर्शक सूचना

**स्वच्छता साधने उत्पादन व विक्री केंद्र**

शौचालयाचे पॅन/मलपात्र, पीस्ट्रॅप/जलबंध आणि आडोशाचे प्री फॅबरीकेटेड बांधकाम इत्यादीचे उत्पादन आणि विक्रिसाठी स्वच्छता साहित्य विक्रि केंद्र चालविण्यासाठी मुख्य साधन संस्थांची मदत घेण्याबाबत निर्मल भारत अभियानामधील मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था स्वतंत्र मार्गदर्शक सूचना निर्गमित करेल.

**(शासन निर्णय क्र.केआरसी§३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)**

# परिशिष्ट - ११

## निर्मल भारत अभियानांतर्गत निर्मलदूत उपक्रम कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी मार्गदर्शक सूचना

केंद्र सरकारने माहिती, शिक्षण व संवाद उपक्रमामध्ये अंतरव्यक्ती सवाद पक्रियेला ( IPC) जे अनन्य साधारण महत्व दिले आहे त्या अनुषंगाने राज्यामध्ये निर्मलदूत कार्यक्रम प्रभावीपणे राबविण्यासाठी मुख्य साधन संस्थांची मदत घेण्यात येणार आहे. गावपातळीवर पाणी व स्वच्छता क्षेत्राच्या कामासाठी मुख्य साधन संस्था, तालुका गट समन्वयक, ग्रामपंचायत व निर्मलदूतांचे उद्देश, अंमलबजावणी, निर्मलदूतांची निवड पक्रिया, निर्मलदूतांची विविध भागधारकाच्या भूमिका व जबाबदारी, मार्गदर्शक सूचना

**निर्मलदूत उपक्रमाचा उद्देश :-**

गावपातळीवर स्वच्छता संबंधी प्रभावीपणे कामे होण्यासाठी निर्मलदूत निवडीचे उद्देश खालीलप्रमाणे राहतील.

१) गावपातळीवर स्वच्छता व आरोग्याची स्थिती सूधारण्यासाठी, शौचालय बांधकाम करुन त्याचा नियमित वापर होण्यासाठी तसेच गाव हागणदारीमुक्त करण्यासाठी संवाद धोरणाच्या अंतरव्यक्ती संवाद व समुदाय गतिशील उपक्रमांचे आयोजन करण्यासाठी प्रशिक्षीत निर्मलदूत विकसित करणे.

२) निर्मल भारत अभियानाचे उद्दीष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने ग्रामपंचायतीस तांत्रिक सहाय्य करण्यासाठी तसेच गावपातळीवर वंचीत असलेल्या समुदायापर्यंत पोहचून त्यांच्या वर्तणूकीतील बदल घडवून आणून हागणदारी निर्मूलन आणि वैयक्तिक स्वच्छतेसाठी निर्मलदूताची निवड करणे.

३) गावपाळीवर विविध भागधारकांमध्ये उदा. पंचायत राज सदस्य, ग्रामसेवक, पाणीपूरवठा व स्वच्छता समिती सदस्य, जलसुरक्षक, अंगणवाडी सेविका, बचतगट, रोजगार सेवक, तालुका गट समन्वयक आणि कल्स्टर समूह समन्वयक (बी आर सी) यांच्यामध्ये समन्वय साधणे

४) निर्माण झालेल्या स्वच्छता सुविधांची शाश्वतता टिकवून ठेवण्याच्या दृष्टीने शौचालय बांधकामा दरम्यान तसेच निर्माण झालेल्या स्वच्छता सुविधांच्या देखभाल दुरूस्ती दरम्यान सनियंत्रण करणे.

**निर्मल दूत उपक्रम अमलबजावणी:-**

प्रत्येक जिल्ह्याच्या वार्षिक कृती आराखड्यामध्ये निर्मलदूत उपक्रमाचा समावेश अनिवार्य असेल. या उपक्रमासाठी दरवर्षी किमान ५० गावांचा एक प्रकल्प राबविणे अत्यावश्यक असेल.

**निर्मलदूत निवडीसाठीचीकार्यपद्धत :-**

उपरोक्त बाबी साध्य करण्याच्या दृष्टीने निर्मलदूत निवडीसाठीप्रभावी प्रक्रिया पार पाडण्याच्या दृष्टीने खालील पाय-यांचा अवलंब करण्यात यावा.

१) १५० कुटुंबासाठी एक याप्रमाणे ग्रामपंचायात स्तरावर निर्मलदूतांचीनिवड करण्यात यावी. संबंधीत गावातून मुख्य साधन संस्था -३ संभाव्य निर्मलदूतांची निवड यादी तयार करुन त्या त्या गट विकास अधिकाऱ्यांकडे सादर करेल. त्यानंतर निर्मल दूताची अंतिम निवड मुख्य साधन संस्थेचा प्रतिनिधी, जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाचा प्रतिनिधी आणि गट विकास अधिकारी, संबंधीत पंचायत समिती या तीन सदस्यांची समिती करेल. निवड समितीचे प्रमुख गट विकास अधिकारी पंचायत समिती हे राहतील.

२) निर्मलदूताची निवड करताना महिलांना प्राधान्य राहील.

३) जर एखाद्या ग्रामपंचायतीमध्ये अनुसूचित जाती/जमातींची कुटुंब संख्या जास्त असेल तर निर्मदूतांची निवड अनुसूचित जाती/जमातींतून करण्यात यावी.

४) जर एका पेक्षा जास्त निर्मलदूतांचीनिवड करण्यात आली असेल तर गावनिहाय कुटुंबाची यादी तयार करुन प्रत्येक निर्मलदूतास त्यांनी संपर्क साधावयाच्या कुटुंबाची जबाबदारी निश्चित करावी.

**विविध भागधारकांच्या भूमिका व जबाबदा-या:-**

निर्मलदूत तसेच या कार्यक्रमांतर्गत सहभागी असलेल्या विविध भागधारकांच्या भूमिका व जबाबदा-या खालीलप्रमाणे राहतील.

**पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था :-**

१)निर्मलदूत कार्यक्रमाची मार्गदर्शक सूचना निर्गमित करणे.

२)जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाचे उन्मुखीकरण करणे.

३)मुख्य साधन संस्थांची क्षमता बांधणी करणे.

४)मुख्य साधन संस्थेने पाणी व स्वच्छता मिशन कक्षाकडे सादर केलेल्या प्रकल्प प्रस्तावाचे प्रमाणीकरण करणे.

५)सध्याच्या अंतरव्यक्ती संवाद साहित्याचे संकलीकरण करणे व निर्मलदूतांना गावपातळीवर उपयोगात आणता येतील अशा नविन अंतरव्यक्ती संवाद साहित्याची निर्मिती करणे.

६)जिल्हा, तालुका, व गावपातळीवर केलेल्या उपक्रमांचा नियमित आढावा घेणे.

७)निर्मलदूतांनी अंमलबजावणी केलेल्या उपक्रमांचा नियमित आढावा घेणे.

८)जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामर्फत मुख्य साधन संस्थेस होत असलेल्या निधी वितरणाची खात्री करणे.

९)यशोगाथांचे दस्तावेजीकरण करणे.

**जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष :-**

१)१०० कुटुंबापेक्षा जास्त उघड्यावर हागणदारी असलेल्या ग्रामपंचायतींचा समावेश वर्षिक अंमलबजावणी आराखडयात करणे.

२)तयार करण्यात आलेल्या पॅनेल मधील मुख्य साधन संस्थांची नियुक्ती करणे

३)अंतरव्यक्ती संवाद तसेच माहिती, शिक्षण संवाद साहित्याची निर्मिती करणे व ते मुख्य साधन संस्थेला वितरीत करणे.

४)निर्धारीत कालावधीत निधीचे वितरण करणे.मुख्य साधन संस्था व निर्मलदूतांच्या कामांचे सनियंत्रण करणे.

**मुख्य साधन संस्था:-**

१)पायाभूत सर्वेक्षण व वार्षिक अंमलबजावणी आराखडयावर आधारित प्रकल्प प्रस्ताव तयार करणे व ते पाणी व स्वच्छता मिशन कक्षास सादर करणे.

२)ग्रामपंचायतीच्या सल्ल्याने निर्मलदूतांची निवड करणे.

३)वार्षिक अंमलबजावणी आराखडयात समाविष्ट असलेल्या ग्रामपंचायतींचा हागणदारी निर्मूलन आराखडा तयार करणे.

४)मागणी वाढविण्यासाठी व अंतरव्यक्ती संवाद साधण्यासाठी निर्मलदूतांचे उन्मुखीकरण करणे.

५)गृहभेटी व समुदायस्तरावर विविध उपक्रमांच्या आयोजनांसाठी कॉन्टक्ट ड्राईव्ह सह निर्मलदूतांसाठी

दैनंदिन उपक्रमांचे वेळापत्रक तयार करणे.
६)अंतरव्यक्ती संवाद व आय ई सी साहित्य निर्मलदूतांना वितरीत करणे
७)निर्मलदूतांच्या कामांचे सनियंत्रण करणे, देखरेख करणे व आवश्यक त्या ठिकाणी सहाय्य करणे
८)ग्रामपंचायतींशी सुयोग्य समन्वय साधणे
९)निर्मलदूताने केलेल्या कामांचे मुल्यमापन झाल्यानंतर मार्गदर्शक सूचनेनुसार निर्मलदूतांना प्रोत्साहन निधी अदा करणे
१०) ग्रामपंचायतस्तरावर प्रगती अहवाल व आवश्यक अभिलेखे अचूक व अद्यावत असल्याची खात्री करणे
११) आर्थिक लेखे व प्रगती अहवाल पाणी व स्वच्छता मिशन कक्षास सादर करणे

**तालुका साधन गट :-**

१)वैयक्तिक शौचालय बांधकामाच्या प्रस्तावास कार्यालयीन मंजूरी देण्याच्या अनुषंगाने आवश्यक ते सहाय्य करणे
२)लाभार्थींना प्रोत्साहन निधीचे मर्यादीत कालावधीत निधीचे वितरण करणे
३)तालुकास्तरावरील माहिती, शिक्षण संवाद उपक्रमांत ग्रामपंचयातींना सहभागी करुन घेणे
४)ग्रामपंचायत स्तरावर प्रक्रिया हाताळणीचे सुलभीकरण करणेमहात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमीयोजनेच्या समन्वयसाठी योग्य समन्वय साधणे

**ग्रामपंचायत :-**

१)पात्र निर्मलदूतांच्या निवडीसाठी मुख्य साधन संस्थेस सहकार्य करणे
२)हागणदारी निर्मूलन आराखडयाच्या नियोजन प्रक्रियेत मुख्य साधन संस्थेस सहकार्य करणे व तयार झालेल्या आराखडयास ग्रामसभेची मंजूरी घेणे
३)निर्मलदूत आपली भूमिका व जबाबदारी योग्यरीतीने पार पाडतील यादृष्टीने सदर कार्यक्रमाच्या ध्येयपूर्तीसाठी निर्मलदूताना आवश्यक ते सहकार्य करणे
४)निर्मल भारत अभियांनांतर्गत गावपातळीवर अंतरव्यक्ती संवाद व समुदाय गतीशील करण्यासाठीच्या उपक्रमात सहभाग घणे
५) निर्मल भारत अभियानांतर्गत गावस्तरावरील सर्व शासकीय विभागांचे प्रतिनिधी या अभियानात सहभागी होत असल्याची खात्री करणेतिमाही प्रगती अहवालाचे प्रमाणीकरण करुन मुख्य साधन संस्थेस सादर करणे

निर्मलदूत :-

१)ग्रामपंचायती अंतर्गत कुटुंबांच्या स्वच्छता स्थितीच्या नोंदी घेणे

२)मुख्य साधन संस्थेस ग्रामपंचायतीचा गावाचा हागणदारी निर्मूलन कृती आराखडा तयार करण्यासाठी सहकार्य करणे

३)शौचालय बांधकामासाठी मागणी वाढविण्याच्या दृष्टीने गृहभेटी देणे व वेळोवेळी सामुदायिकस्तरावर विविध उपक्रमांचे आयोजन करणे

४)स्वच्छतास्थितीची प्रगतीच्या नोंदीसाठी प्रक्षेत्र नोंदवही अद्यावत ठेवणे (संदर्भ पहा)

५)गवंडयांना एकमेकांशी जोडून शौचालय बांधकामा दरम्यान गुणवत्ता सनियंत्रण करणेगाव हागणदारी मुक्त होईपर्यंत गावपातळीवर स्वच्छता दिनाचे आयोजन करण्यासाठी ग्रामपंचायतीस प्रवृत्त करणे

## राज्य स्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांच्या माध्यमातून निर्मलदूत उपक्रम राबवितांना लागणाऱ्या खर्चासाठी मार्गदर्शक सूचना

| अ. क्र. | तपशिल | प्रति एकक रक्कम | एकक | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | क्षमता बांधणी | २,०००/- | ५० | १,००,०००/- |
| २ | समन्वयक मानधन | १५,०००/- | १२ | १,८०,०००/- |
| ३ | पर्येवेक्षक मनाधन | ८,०००/- | ३६ | २,८८,०००/- |
| ४ | समन्वयक प्रवास | ३,०००/- | १२ | ३६,०००/- |
| ५ | पर्यवेक्षक मानधन | ३,०००/- | ३६ | १,०८,०००/- |
| ६ | दस्तऐवजीकरण | १,०००/- | १२ | १२,०००/- |
| ७ | संपर्क खर्च | २,०००/- | १२ | २४,०००/- |
| ८ | स्टेशनरी आणि छपाई | २,०००/- | १२ | २४,०००/- |
| ९ | आयत्या वेळेचा खर्च | १,०००/- | १२ | १२,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १० | युनिफॉर्म (निर्मलदूत) | ५००/- | ५० | २५,०००/- |
| **१ ते १० घटाकंची एकूण रक्कम** | | | | ८,०९,०००/- |
| ११ | व्यवस्थापकीय खर्च (एकूण खर्चाच्या ५ टक्के ) | | | ४०,४५०/- |
| **एकूण** | | | | ८,४९,४५०/- |

| **अ.क्र.** | **सारांश** | **एकूण रक्कम** |
|---|---|---|
| १ | निर्मलदूत कार्यक्रमासाठी प्रोस्ताहनपर रक्कम (५० गावे आणि प्रती गावात १५० कुटुंबे याप्रमाणे) | १०,५२,५००/- |
| २ | जिल्हा मुख्य साधन संस्थेअंतर्गत राबविल्या जाणा-या उपक्रमांना साहाय्य | ८,४९,४५०/- |
| एकूण | | १९,०१,९५०/- |
| प्रति कुटुंब रक्कम | | २५४/- |
| प्रति गाव रक्कम | | ३८,१००/- |

निर्मलदूत प्रकल्प राबवितांना निर्मल भारत अभियानाच्या जिल्हास्तरीय माहिती, शिक्षण व संवाद उपक्रमांतर्गत एकूण तरतूदीपैकी अंतरव्यक्ती संवाद प्रक्रियेसाठी असलेल्या ६० % निधीतून या उपक्रमांचा खर्च भागविण्यात यावा.

**(शासन निर्णय क्र.केआरसी§३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)**

# परिशिष्ट - 12

**राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थांची निवड सूची**

पाणी व स्वच्छता क्षेत्रात विविध उपक्रमांतर्गत केंद्र व राज्य शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार कार्यक्रम अंमलबजावणी निरंतर मुल्यमापन, संनियंत्रण व पर्यवेक्षणाचे काम राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थाकडून करण्यात येईल. तसेच प्रशिक्षण मुल्यमापन, विशेष उपक्रम इ. गरजेनुसार करुन घेतले जातील.

**राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थांची निवड सूची खालील प्रमाणे**

१) ग्रामोपयोगी विज्ञान केंद्र, पो.बॉक्स नं. २९, दत्तपूर, वर्धा
२) निर्मल गाव निर्माण केंद्र, मु. गोवर्धन,गंगापूर रोड, नासिक
३) अप्पा पटवर्धन सफाई व पर्यावरण तंत्रनिकेतन, देहूरोड, ता. हवेली जिल्हा, पुणे
४) महाराष्ट्र गांधी स्मारक निधी, सर्वे क्र. ३६, गांधी भवन कोथरुड, पुणे
५)महात्मा फुले समाज सेवा मंडळ, नियोजन नगर, जामखेड रोड, पोष्ट बॉक्स नं. ९ करमाळा, जिल्हा सोलापूर
६)जानकी देवी बजाज ग्राम विकास संस्था, सर्व्हे नं. ४२७२, आकुर्डी पोस्ट ऑफिसजवळ आकुर्डी, पुणे
७)कुष्ठरोग निवारण समिती, पो. नेरे, ता. पानवेल, जिल्हा रायगड
८)सोसायटी फॉर इम्पॉवर ऑफ व्हिलेजेस ॲण्ड ॲग्रीकल्चर (सेवा), सातारा
९)प्राइमुव्ह इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलेपमेंट, सी-३, ३०४ बी सौदामिनी कॉम्प्लेक्स, उजवी भूसारी कॉलनी, पौड रोड, पुणे
१०)गोपूरी आश्रम, मु.पो.वागदे, गोपूरी, ता. कणकवली, जिल्हा सिंधुदुर्ग
११) ॲक्शन फॉर ॲग्रिकल्चरल रिन्युअल इन महाराष्ट्र, रसायनी पार्क, मार्केट यार्ड, पुणे
१२)ईकोसॅन सर्व्हिसेस फाउंडेशन, फलॅट क्र. १, पहिला मजला, २४, प्रशांत नगर, ७२१/१, पेठ, पुणे
१३)स्वंयशिक्षण प्रयोग, उस्मानाबाद, जिल्हा उस्मानाबाद
१४)संस्कार वाहिनी ग्राम विकास संस्था, ४४ कोल्हटकर कॉलनी, शिलांगन रोड, अमरावती
१५)अथिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था, पिनाक मेमरिज, फेज २, एल बिल्डिंग, कोथरुड स्टॅंड जवळ, पुणे
१६)टाटा सामाजिक विज्ञान संस्था, तुळजापूर परिसर, आपलिंग रोड, तुळजापूर, जिल्हा उस्मानाबाद
१७)डॉ. आंबेडकर शिक्षण, शेती संसाधन आणि विकास संस्था, मु. पो. चोरोची ता. कवठेमहाकांळ,

जिल्हा सांगली
१८)रिद्धी फाँउडेशन, कलकत्ता
१९)उगम ग्रामीण विकास संस्था, उमरा सोडेगाव फाटा ता. कळमनुरी, जिल्हा हिंगोली
२०)आयडियल सेंटर फॉर एन्टपप्रिनिअरशिप डेव्हलपमेंट ॲण्ड सेल्फएम्प्लॉयमेंट ट्रेंनिंग,सांगली
२१)सोसा ट्रेनिंग ॲण्ड प्रमोशन ट्रेनिंग इनस्टिटयुट (स्टापी), म्हाडा कर्मशियल कॉम्प्लेक्स, पहिला मजला महाराष्ट्र हाउसिंग बोर्ड कॉलनी, सैनिक सहकारी, पुणे
२२)प्रगती बहुउद्देशीय संस्था, क.भा. लांडगे, तहसिल कचेरीजवळ, सलीम नगर वरोरा, चंद्रपूर

**(शासन निर्णय क्र.केआरसी§३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८,दिनांक १ सप्टेंबर,२०१४ सोबतचे सहपत्र)**

# परिशिष्ट - १३

**राज्यस्तरीय मुख्य प्रधान साधन संस्थांची निवड सूची**

जिल्हा व राज्यस्तरावर निवड झालेल्या सर्व मुख्य साधन संस्थांची क्षमता बांधणी, जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांच्या माध्यमातून झालेल्या कामाचे मुल्यमापन त्याच प्रमाणे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सुधारणा सहाय्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष आणि शासनाने ठरवून दिलेले विशेष उपक्रम इत्यादीसाठी राज्यस्तरिय मुख्य प्रधान संस्थांची मदत घेण्यात येईल.

**राज्यस्तरीय मुख्य प्रधान साधन संस्थांची निवड सूची खालील प्रमाणे**

१). ग्रामोपयोगी विज्ञान केंद्र, पो.बॉक्स नं. २९, दत्तपूर, वर्धा

२).निर्मल गाव निर्माण केंद्र, मु. गोवर्धन,गंगापूर रोड, नासिक

३).अप्पा पटवर्धन सफाई व पर्यावरण तंत्रनिकेतन, देहूरोड, ता. हवेली जिल्हा, पुणे

४).रिद्धी फॉउडेशन, कलकत्ता

५). प्राइमुव्ह इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलेपमेंट, सी-३, ३०४ बी सौदामिनी कॉम्प्लेक्स, उजवी भूसारी